**शेतीप्रधान समाजांचे आधुनिकीकरण**

**वसंत पळशीकर**

'बैलगाडीच्या युगातून जेट युगात उड्डाण' अशा शब्दांत मागास देशांच्या विकास प्रयत्नांचे वर्णन करण्यात येते. हे उड्डाण करण्यासाठी अत्याधिक तंत्रविद्येचे सहाय्य घेतले पाहिजे अशी एक दृढ भावना या देशातील नेत्यांची होती. केवळ राजकारणी नेत्यांचीच नव्हे तर सामाजिक शास्त्रांच्या - विशेषतः अर्थशास्त्राच्या - क्षेत्रातील विचारवंतांची देखील अशी भावना होती. यात एक 'बदसूर' कदाचित् गांधींचाच होता. पण नेहरूप्रणीत नियोजनयुगाच्या कोलाहलात तो कधीच पार बुडून गेला. खादी ग्रामोद्योग कमिशनच्या रूपाने नेहरूंनी एक तुकडा फेकून गांधींचे याबाबतीतले ऋण फेडून टाकले. 'आधुनिकीकरण ही बेकारीची जननी आहे'* हा शोध लागल्यापासून हे उड्डाण काही वेगळ्याच मार्गाने करायला हवे होते, नव्हे उड्डाण करणेच मुळात चूक होते असा फेरविचार होत आहे. असा फेरविचार करणाऱ्या पुस्तकांमध्ये गी इंटर यांची ही दोन पुस्तके विशेष लक्षणीय आहेत. आर्थिक विकासाचे शास्त्र त्यांनी मांडलेले नाही; त्यांनी चार शहाणपणाच्या गोष्टी सांगितल्या आहेत. आफ्रिकेतल्या वेगवेगळ्या देशांतला दहाबारा वर्षांचा अनुभव त्यांच्या गाठीला आहे. 'मॉडर्नायझिंग पेझंट सोसायटीज' हे पुस्तक लिहिण्याआधी भारतात व इतर काही आशियाई देशांत फिरून त्यांनी विकासप्रयत्नांतून उपस्थित झालेल्या अडचणींचा, समस्यांचा मुद्दाम अभ्यास केला.

** हार्बिसन, 'द जनरेशन ऑफ एम्प्लॉयमेंट इन न्यूली डेव्हलपिंग कन्ट्रीज्', केरिचो कॉन्फरन्स, युनिव्हर्सिटी ऑफ नैरोबी, १९६६, वरून उद्धृत, द बेस्ट ऑफ बोथ वर्ल्ड्स, पृ.३१.*

आफ्रिका - आशिया खंडातील गरीब देशांना संपन्नता प्राप्त झाली पाहिजे याविषयी दुमत कोणाचेच नाही. त्यासाठी या देशांचे आज ना उद्या औद्योगीकरण व्हायला हवे. विविध उद्योगांची, व्यवसायांची, सेवांची वाढ झाली पाहिजे याबद्दलही वाद नाही. पण हे कसे करावयाचे?

संपन्न पाश्चिमात्य देशांतून ज्या गोष्टी आढळतात त्या लौकरात लौकर आपल्या देशात सुरू कराव्यात, त्यासाठी पाश्चिमात्य देशांची मदत घ्यावी असे धोरण सामान्यतः अंगिकारले गेले. पाश्चिमात्य राष्ट्रे ज्या सर्व पायऱ्या चढून गेली त्या सर्व पायऱ्या चढून जाण्याचे आपणास काही कारण नाही, 'पुढच्यास ठेच मागचा शहाणा' या न्यायाने आपण उद्योगधंदे, समाजकल्याण, मालक-मजूर संबंध, शासन व राजकारण या सर्व वेगवेगळ्या क्षेत्रात 'प्रगल्भ' संस्था, पद्धती, तंत्रे व रीतिरिवाज यांचा स्वीकार करावा अशी भूमिका घेतली गेली.

या भूमिकेत दुहेरी गफलत आहे. पहिली गफलत अशी की, पाश्चात्त्य राष्ट्र संपन्न असतील पण म्हणून पाश्चात्त्य राष्ट्रांत आढळणाऱ्या सर्वच गोष्टी प्रगल्भ आहेत, घेण्यासारख्या आहेत असे आपोआप सिद्ध होत नाही. दुसरी गफलत अशी की, तत्त्व हे सर्वत्र तेच हे सत्य असले तरी त्याचा मानवी संस्था, पद्धती, तंत्र, रीती या स्वरूपात होणारा आविष्कार हा स्थलकालसापेक्ष असतो, त्या समाजाच्या तत्कालीन संस्कृतीची, गरजांची एक अनिवार्य बैठक त्यापाठीशी असते ही गोष्ट लक्षात घेतली गेली नाही.

पण वैचारिक गुलामी आपल्या इतकी हाडीमांसी खिळलेली होती - आणि अद्यापही आहे - की मागास देशांतल्या श्रेष्ठींना साधे शहाणपणही सुचले नाही. उदाहरणार्थ, हे सर्वच देश शेतकीप्रधान, पण या देशांतील शेती मात्र निकृष्ट उत्पादन देणारी. या देशांत बहुतेक लोकांचा आहार निकृष्ट, आणि वर तोही सर्वांना पोटभर मिळत नाही अशी अवस्था. तेव्हा, पहिला प्रश्न कोणता असे म्हटले तर, वास्तविक, उत्तर सरळ व सोपे आहे. सर्वांना पोटभर सकस व चौरस आहार मिळू शकेल इतके शेतीचे उत्पादन वाढवावयाचे, गुणात्मकदृष्ट्या त्यात विविधता आणावयाची, होणाऱ्या उत्पादनाचे सर्वांना पोटभर खाता येईल असे वाटप होईल अशी व्यवस्था निर्माण करावयाची. मग या गोष्टींवर बहुतेक देशांतून भर दिलेला का आढळत नाही?

शेतीप्रधान देशांचे संक्रमण उद्योगप्रधान देशांत करावयाचे म्हणजे शेतीवरून लोक काढून ते कारखान्यांतून (व शहरांतून) कामाला लावायचे असा एक दृढ समज दिसून येतो. त्या पाठीमागे, शेतीवरचे लोक शहरांतून येऊन कारखान्यांतून काम करू लागल्याने पाश्चात्त्य देशांतून औद्योगिक क्रांती घडून आली, असे एक विश्लेषण असते. आणि म्हणूनच आधुनिकीकरण म्हणजे औद्योगिकरण व शहरीकरण असे एक चुकीचे समीकरण डोक्यात पक्के आढळते. त्याचाच परिणाम म्हणून, शहरांची वाढ ही एक स्वयंसिद्ध चांगली गोष्ट आहे असे मानले जाते. शेतीचे उत्पादन वाढविण्यास मध्यवर्ती महत्त्व दिले न जाण्याचे एक मुख्य कारण, शेतीप्रधान देशांचे वरील (चुकीच्या) अर्थाने उद्योगप्रधान देशात परिवर्तन करण्याची या देशातील नेत्यांना लागलेली घाई, हे होय.

पाश्चिमात्य देशांत आधी शेती उत्पादन वाढले आणि त्या वाढीव उत्पादनामुळे अर्थउद्योगव्यवस्थेची बैठक अधिक विविधतापूर्ण होऊ शकली, या गोष्टीकडे हंटर यांनी लक्ष वेधले आहे. कारखानदारीकरणाच्या अवस्थेत जे परिवर्तन दृग्गोचर झाले ते वस्तुतः त्या आधीच गावोगाव घडून आले होते. विखुरलेल्या स्वरूपातील लघु उद्योगप्रधान औद्योगीकरण एका अवस्थेत कारखानदारीत परिवर्तित झाले. या मधल्या अवस्थेचे आर्थिकदृष्ट्या असलेले महत्त्व मागास देशांनी ओळखणे आवश्यक आहे हा हंटर यांचा एक महत्त्वाचा मुद्दा आहे.

बहुतेक मागासलेल्या देशांतून लोकसंख्या झपाट्याने वाढत आहे. (काही देशांच्या बाबतीत दरडोई उपलब्ध जमीन पुष्कळ वाटत असली तरी जमिनीची प्रत व त्या जमिनीची आजची उत्पादनक्षमता लक्षात घेता जमीन फार नाही.) याचा एक परिणाम असा की, कोणत्याही मार्गांनी उत्पादन वाढवून भागण्यासारखे नाही; लोकांना कामही मिळाले पाहिजे. लोकांना रोजगार मिळतो आहे की नाही याकडे दुर्लक्ष करून, लोकसंख्येच्या काही एका मर्यादित भागापुरती अत्याधुनिक तंत्रविद्येच्या सहाय्याने दरडोई उत्पादकता वाढवून भागणार नाही. याच्याच जोडीला हंटर यांनी दुसरा एक मुद्दा मांडला आहे. आजची संपन्न पाश्चिमात्य राष्ट्रे औद्योगिकदृष्ट्या विकसित होत होती तेव्हा बाकीचे जग त्यांच्या पायाशी लोळण घेत होते. आज मागास राष्ट्रांची परिस्थिती अत्यंत दुबळी आहे; म्हणजे सर्वस्वी विरोधी आहे. म्हणजेच, आपल्या मालाला - औद्योगिक व शेतकी - या देशांना, परदेशी चलन मिळविण्यासाठी चालविलेले काही विशेषीकृत उत्पादन सोडता, प्रामुख्याने आपल्या देशातच बाजारपेठ निर्माण केली पाहिजे.

आजच्या मागास देशांच्या या विशेष परिस्थितीमुळे त्यांचा विकासाचा मार्ग हा वेगळाच रहायला हवा. त्यात निव्वळ उत्पादनवाढीवर भर न देता, उत्पादनवाढीबरोबरच अधिकाधिक लोकांचे म्हणजेच प्रामुख्याने खेडोपाडी पसरलेल्या लहानमोठ्या शेतकऱ्यांचे उत्पन्न वाढेल यावर भर दिला पाहिजे. शेती सघन झाली म्हणजे शेतीतच आजच्यापेक्षा अधिक माणसे नीटपणे कामाला लागतील ही पहिली गोष्ट आणि शेतकऱ्यांच्या हातचे उत्पन्न वाढले म्हणजे शेतकऱ्यांच्या हातातील पैशातूनच उद्योगधंदे, विविध व्यवसाय व सेवा यांचे जाळे निर्माण होईल, त्यासाठी बाजारपेठ अस्तित्वात येईल. या देशांतून मनुष्यबळ विपुल उपलब्ध आहे, ते मनुष्यबळ बरेचसे शेतीवरच गुजराण करीत आहे. या माणसांनी ठरविले तरी त्यांना शेती सोडून अन्य व्यवसायात आज पुरेशा संख्येने रोजगार उपलब्ध नाहीत, आणि बिगरशेती मालाला मोठी व सार्वत्रिक बाजारपेठ उत्पन्न झाल्याशिवाय ते होणारही नाहीत. आणि शेती सघन करण्यास, अधिक उत्पादनक्षम करण्यास भरपूर वाव आहे. असे हे साधे शहाणपण आहे.

हंटर यांनी आपल्या विवेचनात एक हिशेब उद्धृत केला आहे. त्यानुसार एखाद्या देशाची शहरी लोकसंख्या एकूण संख्येच्या २० टक्के असेल, शहरी लोकसंख्येत ६ टक्क्यांनी वाढ होत असेल आणि एकूण लोकसंख्येत २ टक्क्यांनी वाढ होत असेल, तर २५ वर्षांनी ग्रामीण लोकसंख्येचे एकंदर लोकसंख्येशी असलेले प्रमाण कमी होईल पण केवळ संख्येच्या दृष्टीने ती तेवढीच कायम राहील; आणि लोकसंख्या वाढीचा वेग जर ३ टक्के असला तर संख्येच्या दृष्टीनेही ती २५ वर्षांनंतरही जास्तच असेल. भारतासारख्या देशाने यापासून काय बोध घ्यावा? एक सरळच बोध असा की, शहरातून स्थलांतर व शहरीकरण हा ग्रामीण भागातील व शेतीवरील भार कमी करण्याचा मार्ग आपल्या देशात होऊच शकत नाही. असे असेल तर, उघडच, खेडेगाव हा आपल्या विचारांचा, धोरणांचा, कार्यक्रमांचा केंद्रबिंदू केला पाहिजे; म्हणजे खेड्यापाड्यांचे आधुनिकीकरण, औद्योगीकरण, समृद्धीकरण करण्याचे उद्दिष्ट अंगिकारले पाहिजे.

लोकसंख्या, बाजारपेठ, साधनसंपत्तीची उपलब्धता, तंत्रविद्यात्मक कौशल्य, इत्यादी आर्थिक विकासाशी संबंधित मूलभूत घटकांचा विचारदेखील गरीब देशात केला गेला नाही, तर मग त्या त्या समाजांची ऐतिहासिक-सांस्कृतिक वैशिष्ट्ये, सामाजिक व नैतिक मूल्यप्रणाली, आदर्श यांचा विचार केला गेला नसल्यास नवल नाही. पाश्चात्त्य देशांनी जी संपन्नता पदरात पाडून घेतली आहे तो संपन्नतेचा प्रकार हा खरोखरच आपण जसाच्या तसा स्वीकारण्यासारखा आहे काय? माणसाचे आयुष्य कशासाठी आहे व ते कशाप्रकारे व्यतीत व्हावे यासारख्या प्रश्नांची उत्तरे शोधण्याचा फारच थोडा प्रयत्न झाला आहे. या क्षेत्रातही, नव्याने स्वतंत्र झालेल्या राष्ट्रांतील बहुसंख्य नेत्यांनी व विचारवंतांनी उसनवारीच केली आहे. समाजवाद, साम्यवाद, भांडवलशाही, मिश्र अर्थव्यवस्था, कल्याणकारी राज्य या साऱ्याच सिद्धांत प्रणाली उसनवारीने घेतलेल्या आहेत ही गोष्ट, या वेगवेगळ्या सिद्धांत-प्रणालींच्या नावाने जी धोरणे व कार्यक्रम पुढे मांडले जातात त्यावरून स्पष्ट होते. याला काही गौरवास्पद अपवाद आहेत. गांधी (व श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे यांच्यासारखे त्यांचे अनुयायी), काही प्रमाणात व काही काळ लोहिया, आणि टांझानियाचे अध्यक्ष ज्युलियस न्येरेरे यांचा उल्लेख करण्यासारखा आहे.

खुद्द हंटर यांनी आर्थिक संपन्नतेचा पाश्चात्त्य आकृतिबंधच स्वीकारार्ह मानला आहे. त्या मर्यादित संदर्भातच त्यांनी

आपल्या बहुतेक सर्व हरकती उपस्थित केल्या आहेत. कारखानदारीतील मालक-मजूर संबंध कसे असावेत यासंबंधी गरीब राष्ट्रांनी स्वीकारलेली भूमिका ही कामगारांना अकाली फाजील संरक्षण देणारी आहे, किंबहुना मालक-मजूर संबंध हे एकाच प्रकारचे - शोषक-शोषित असे - असू शकतात अशा ठाम समजुतीवर ती उभारलेली आहे; पण पाश्चात्त्य देशात हे संबंध असेच निर्माण झाले हा एक दुर्दैवी ऐतिहासिक योगायोग आहे व त्यामुळे पाश्चात्त्य समाजव्यवस्थेच्या गाभ्याच्या जागीच एक तणावाचे व विकृतीचे बीज पेरले गेलेले आहे, अशा आशयाचे प्रतिपादन त्यांनी केलेले आहे,* ते फार अर्थपूर्ण आहे. शास्ते-शासित, मालक-मजूर, पालक-मुले या सर्व संबंधाचे आदेशवादी (ऑथॉरिटेरियन) स्वरूपच, एकप्रकारे, पाश्चिमात्य समाजात आज उपस्थित झालेल्या अंतस्थ आणिबाणीचे मूळ आहे. आपल्या राष्ट्रात नव्या समाजाची उभारणी करताना या संबंधांचे स्वरूप कसे सर्वस्वी वेगळे ठेवता येईल याचा विचार करणे अगत्याचे आहे. ते कसे करता येईल यावर हंटर यांनी प्रकाश टाकलेला नाही.

** The fact that at the very heart of industrial civilisation there lay a relationship which was basically authoritarian and non-participatory has caused a bitterness, now perhaps a sourness, which has been and still is, at the root of social tensions in the western world (Modernising Peasant Societies, P. 14–15.)*

आफ्रिका व आशिया खंडातील राष्ट्रांसमोरचा दुसरा प्रश्न लोकांच्या ठिकाणची कार्यशक्ती जागृत करण्याचा आहे. साम्राज्यसत्तांपेक्षा आपण कोणत्याही दृष्टीने कमी प्रगल्भ नाही अशी जहाल राष्ट्रवाद्यांची भूमिका होती. त्या आग्रहापोटी, आणि काही मूल्यांसाठी सर्वच नवस्वतंत्र राष्ट्रांनी प्रातिनिधिक जबाबदार राज्यपद्धतीचा अंगिकार केला. पण ही राज्यपद्धती राबविण्याचा गेल्या वीस-पंचवीस वर्षातला अनुभव फारसा आशादायी ठरलेला नाही. बऱ्याच देशांत तर ती व्यवस्था कोलमडूनच पडली, तर काही देशांतून तेथील नेत्यांनी जाणूनबुजून एकाधिकारवादी व्यवस्थेचा अंगिकार केला. भारतासारख्या देशात आपण बाह्यतः लोकशाही राज्यपद्धती खूपच यशस्वीपणे राबविली आहे. पण तिची जी फलिते आपल्या हाती आज आलेली आहेत त्याबद्दल लोकमानसात एक तीव्र असमाधान आहे.

आर्थिक उत्थानाच्या, विकासाच्या संदर्भात, मुळाशी, प्रश्न सर्जनशील विधायक नेतृत्वाचा आहे. आफ्रिकेतल्या बहुतेक सर्वच नवस्वतंत्र राष्ट्रांच्या बाबतीत तर, साम्राज्यसत्तांच्या रस्सीखेचीत पडलेल्या लहरी तुकड्यांमधून राष्ट्रे घडविण्याची प्रक्रियाही या नेतृत्वाला पूर्ण करावयाची आहे. अमूक एक राज्यपद्धती स्वीकारली की आपोआप सामाजिक क्रांती घडवून आणण्याची क्षमता असलेले नेतृत्व उदयास येईल असा राज्यपद्धतीचा व नेतृत्वाचा संबंध नाही. ही साधी गोष्टही परत, लक्षात घेतली गेली नाही. आपल्या समाजाची रचना वस्तुतः वेगवेगळ्या पातळ्यांवर कशी आहे, तीमध्ये सत्ता कोठे, कशी व का केंद्रित झालेली आहे, नेतृत्वनिर्मितीची सुप्त शक्तिकेंद्रे कोणती आहेत याचा विचार प्रस्तुत होता. आपल्यापुढील उद्दिष्ट गाठण्यास जे नेतृत्व कामी पडेल ते निर्माण होण्यासाठी राज्यपद्धतीचे स्वरूप कसे असावयास हवे, पारंपरिक समाजव्यवस्थेच्या कोणत्या सत्ताकेंद्रांवर घाव घालायला हवेत याचा विचार करणे आवश्यक होते. असा विचार फारसा झालेला आढळत नाही. कदाचित या बाबतीत अपवाद माओचाच करावा लागेल. भारताचे उदाहरण आपल्या डोळ्यासमोर आहे : पारंपरिक समाजव्यवस्थेतली सत्ताकेंद्रे तशीच ठेवून लोकशाही

राज्यपद्धती राबविल्याने त्या केंद्रांची ताकदच अधिक बळकट झालेली आपणास आढळत आहे.

राजकीय संस्थांविषयीच्या विवेचनात हंटर यांनी भारतातल्या राजकीय व प्रशासकीय व्यवस्थेला खूप प्राधान्य दिले आहे. पंचायतीराज्याच्या आगमनानंतरच्या परिस्थितीची त्यांना सम्यक कल्पना आहे असे त्यांच्या विवेचनावरून आढळत नाही. हंटर भारतात केवळ काही महिने राहिले होते ही गोष्ट लक्षात घेता त्यांना देखावा आणि वस्तुस्थिती यातला फरक कळला नाही यात नवल काही नाही. पण त्यामुळे त्यांच्या विवेचनातला हा भाग अतिशय कच्चा राहिला आहे. आफ्रिकेतील परिस्थितीचे त्यांना खोलवर ज्ञान असल्याने विवेचनातला तेवढा भाग पक्का आहे. आफ्रिकेत काही काळ तरी एकाधिकारवादी राज्यपद्धती - न्येरेरे यांनी टांझानियामध्ये प्रस्थापित केलेली त्यांना सर्वात स्वीकारणीय वाटते - आवश्यक आहे असे त्यांचे सर्वसाधारण मत आहे व ते योग्य वाटते. वेगवेगळ्या राजकीय पक्षांची स्पर्धा, चुरस पेलू शकेल इतपतही राष्ट्रीयत्वाची बैठक तेथे निर्माण झालेली नाही. आशियाई राष्ट्रांचा प्रश्न अधिक बिकट आहे. येथे काही एक किमान राष्ट्रीयत्व अस्तित्वात आहे, आणि लोकांच्या राजकीय आकांक्षा जागृत झालेल्या आहेत. त्यामुळे यातल्या बहुतेक देशांतून एकाधिकारवादी राज्यपद्धती ही, लष्करी सत्तेच्या जोरावर दीर्घ काळ टिकवून धरता येत असली तरी, आर्थिक उत्थानाच्या दृष्टीने घातक ठरते. कारण लोकांची अभिक्रमशीलता मारली जाते, किंवा ती राज्यसत्तेच्या विरुद्ध धुमसत राहते. पण जबाबदार प्रातिनिधिक राज्यपद्धतीचा अंगिकार केला तर परंपरागत सत्ताकेंद्रे ती आपल्या स्वार्थासाठी बेबंदपणे वापरतील असा धोका राहतो. ही आपत्ती कशी टाळावयाची या प्रश्नाची चर्चा करण्याचे हंटर यांनी टाळले आहे. फार मोठे जमीनदार ठेवू नयेत, एवढी एकच शिफारस ते करतात. या प्रश्नाला हात घालणे म्हणजे अडचणीत टाकणाऱ्या क्रांतीच्या प्रश्नाला हात घालणे होय या जाणिवेने तर त्यांनी या प्रश्नाचा विचार टाळला नसेल?

मागासलेल्या देशांमध्ये स्वातंत्र्योत्तर काळात शिक्षणाचा फार झपाट्याने विस्तार झाला. कारखानदारीच्या वाढीप्रमाणेच शिक्षणाचा विस्तार हीदेखील एक मानाची व प्रतिष्ठेची बाब बनली. आणि याही क्षेत्रात त्याच प्रकारची गफलत झाली. शाळा-महाविद्यालये -विद्यापीठे यांच्या संख्येत झपाट्याने वाढ करणे, नवनवे अभ्यासक्रम सुरू करणे, संशोधनासाठी मोठमोठ्या राजेशाही संस्था सुरू करणे यावर भर देण्यात आला. येथेही, आपली आजची व पुढच्या पाच-पंचवीस वर्षांतली गरज काय याचा विचार न करता, लौकरात लौकर पाश्चिमात्य देशांची बरोबरी करण्याची घाई त्या पाठीशी होती.

या सर्वच राष्ट्रांत जनसामान्यांच्या बाजूने शैक्षणिक विस्तारासाठी प्रचंड दडपण अलीकडच्या काळात निर्माण झाले आहे आणि ते स्वाभाविक आहे. कारण वाढत्या लोकसंख्येला शेतीत काम नाही, आणि पगारी रोजगार हा 'शिकलेल्यां'नाच फक्त मिळतो; साहजिकच प्रत्येकाची 'शिकण्या'ची धडपड चालू आहे. या संदर्भात एक अत्यंत मार्मिक निरीक्षण हंटर यांनी केले आहे. एकंदरच बेकारीची परिस्थिती असल्याने दिवसेंदिवस विविध शिक्षणक्रमांसाठीच्या व प्रत्येक नोकरीसाठीच्या पात्रतेची पातळी उंचावण्याकडे कल आहे. इच्छुकांची गर्दी टाळण्यासाठी हे केले जाते; तसेच पदवीधर मिळू शकत असताना मॅट्रिक पास कशाला घ्या असाही त्यामागे विचार

असतो. याचा परिणाम असा झाला आहे की, प्राथमिक व माध्यमिक शालांत अभ्यासक्रमांची उपयुक्तताच धोक्यात आली आहे. तिथे आपले शिक्षण थांबविले तर आपणास कोणतीच चांगली नोकरीचाकरी मिळू शकत नाही, याची जाणीव विद्यार्थ्यांत व पालकांमध्ये निर्माण झाली आहे. इतकेच नव्हे, तर प्राथमिक शालांत परीक्षेनंतर शिक्षण थांबविल्यास तांत्रिक शिक्षणक्रमांना प्रवेशही मिळणे दुरापास्त होत चालले आहे. आज बहुतेक तांत्रिक शिक्षणक्रमांसाठी मॅट्रिक पास ही पात्रता लागते. परिणामी आपली बौद्धिक पात्रता-अपात्रता विचारात न घेता माध्यमिक व महाविद्यालयीन शिक्षण घेण्यासाठी विद्यार्थी गर्दी करतात. त्यातून चुकीच्या प्रकारच्या शैक्षणिक विस्ताराच्या दिशेने प्रचंड दडपण निर्माण होते. प्राथमिक शालांत अभ्यासक्रम पुरा केल्यावर ज्यांना शिक्षण सोडून द्यावे लागते त्यांची तर फारच दयनीय अवस्था होते. त्यांना पगारी रोजगाराची दारे बंद असतात आणि इतर प्रकारचे रोजगार फार मर्यादित संख्येने उपलब्ध आहेत. (त्या रोजगारांसाठी तो त्याच्या शिक्षणाने नालायक बनलेला असतो हे परत वेगळेच.) त्यांची पक्कीच कोंडी होते. महाविद्यालये, विद्यापीठे यांमध्ये प्रवेश अमर्यादित असावा, परीक्षा सोप्या कराव्यात, किंबहुना पदवी मिळण्याची हमी असावी या प्रकारचे दडपण हे शैक्षणिक दडपण नसून रोजगारीसाठीचे दडपण आहे हे लक्षात घेतले म्हणजे त्याची स्वाभाविकता ध्यानात येते.

शाळा-कॉलेजे काढली म्हणजे रोजगार निर्माण होत नाही असे एक साधे विधान हंटर करतात. आणि आपल्या लक्षात येते की, भारतामध्ये जो शिक्षणविस्तार केला गेला त्यामागे एक अशी मनोराज्यात्मक समजूत होती, की शेतीवरच्या जादा लोकांना शिक्षण देणे हा त्यांना तेथून काढून नवे रोजगार देण्याचा मार्ग आहे. ही प्रक्रिया उलटी आहे. आधी रोजगाराच्या संधींचा विस्तार व्हायला हवा आणि मग त्यांना अनुरूप असे शिक्षणक्रम सुरू करायला हवेत. आपल्याकडे झालेल्या शिक्षणविस्तारामुळे आणखी एक घोटाळा झालेला आहे. आर्थिक विकासाच्या उपक्रमांमुळे ज्या प्रकारचे रोजगार निर्माण झाले आहेत त्या रोजगारांचे नीट शिक्षण देणारे अभ्यासक्रमच अस्तित्वात नाहीत असाही प्रकार झालेला आहे.

काय करायला हवे ते पुरेसे स्पष्ट आहे व परिचितही आहे. प्राथमिक व माध्यमिक शालांत अभ्यासक्रम पूर्ण करणाऱ्या मुलामुलींना रोजगार मिळेल याद्दष्टीने रोजगारांची निर्मिती मोठ्या प्रमाणावर होईल असा विकासाचा मार्ग जाणूनबुजून निवडला पाहिजे. त्याचवेळी या रोजगारांसाठी योग्य माणसे तयार करण्याच्या द्दष्टीने शिक्षणक्रमांची पुनर्रचना केली पाहिजे. आणि, महत्त्वाची गोष्ट म्हणजे, आपल्या गुणवत्तेच्या व कामगिरीच्या जोरावर वरपर्यंत चढण्याच्या वाटा मोकळ्या असल्या पाहिजेत. डिप्लोमाधारक आणि पदवीधारक यांच्यात हवाबंद कप्पे पडणार असतील तर पदवी घेण्यासाठी विद्यार्थी गर्दी करणार हे स्वाभाविक व योग्यच आहे. कारण वेतन, सामाजिक प्रतिष्ठा दोन्ही द्दष्टींनी आपणहून कोणी हीन जीवन का पत्करील?

हंटर यांनी मांडलेला विचार अनेक ठिकाणी गांधींच्या प्रतिपादनाशी समांतर असावा यात काहीच आश्चर्य नाही. पूर्वस्वीकृत सिद्धांत वा नमून्यापासून आरंभ न करता वास्तवापासून सुरुवात करणारा कोणीही शहाणा माणूस ज्या गोष्टींवर भर देईल त्या सारख्याच असणार. आपण गरीब आहोत, अकुशल आहोत, संख्येने फार आहोत, खेडोपाडी

पसरलेले आहोत, आपणाला पुरेसे काम नाही; अशा परिस्थितीत काही अवास्तव कल्पना बाळगून विकासासाठी प्रस्थान ठेवण्याऐवजी अगदी साध्या, प्राथमिक गोष्टींपासून सुरुवात करावी. लोक जेथे राहतात तेथे त्यांचे कौशल्य व त्यांची साधनसंपत्ती लक्षात घेऊन त्यांना काम दिले जावे. त्यांच्या प्राथमिक गरजा भागत नाहीत, त्या प्रथम भागवाव्यात. त्यांच्या दैनंदिन जीवनात सुभगता यावी. तूर्त हे एक पाऊल पुढे टाकणे पुरे आहे. ग्रामोद्योगप्रधान औद्योगीकरणाच्या गांधींच्या भूमिकेचा आशय हाच आहे.

नवस्वतंत्र राष्ट्रांत राजकारणाला कोणते कार्य बजवावयाचे आहे त्यासंबंधी असेच अत्यंत मार्मिक विवेचन हंटर यांनी केले आहे. ते म्हणतात, "पृष्ठभागावरच लक्ष केंद्रित केले तर राजकारण म्हणजे केवळ सत्तास्पर्धा असे वाटते, व क्षणभंगुर पातळीवर राजकारणाचे स्वरूप तसे असतेही. पण मूलतः आणि दीर्घकालीनदृष्ट्या राजकारणाला समाजव्यवस्थेशी कर्तव्य असते. विकसनशील देशांची राजकीय समस्या, मुळात, समाजव्यवस्था निर्माण करण्याची आहे, तर तात्कालिक समस्या, राष्ट्राचा नाश करण्याइतकी सत्तास्पर्धा बेबंद होणार नाही यासाठी काय उपाय योजावेत, ही आहे." ते पुढे म्हणतात, "राजकारणाच्या धकाधकीतूनच व्यवस्था आकारास येणार हे निश्चित; पण एका सच्च्या राजकीय तत्त्वज्ञानाच्या बैठकीवरच तिची उभारणी होऊ शकते." हा शोध मनावर ठसणे फार फार निकडीचे आहे.

हंटर यांची ही दोन्ही पुस्तके आर्थिक विकास व सामाजिक पुनर्रचना या विषयात रस असणाऱ्यांनी जरूर वाचावीत अशी आहेत. अनेक जागी त्यांचे निरीक्षण सूक्ष्म व मार्मिक आहे. नमून्यादाखल पुढील तीन विधाने पहा.

(१) "... कोणतीही पुरोगामी कृती करणे म्हणजे सर्वात पददलित असलेल्यांच्या तोंडचा घास काढून घेण्यासारखे होण्याची शक्यता आहे. शेतीप्रधान समाजातील या 'बुडत्या' दलितवर्गाला अक्षरशः काडीचा आधार असतो. परिस्थितीत काही बदल केला, पण त्याच वेळी एका दमात दलितांना एका उच्चतर व वृद्धिंगत होणाऱ्या उत्पादनव्यवस्थेत समाविष्ट करता आले नाही, तर पोटाची खळगी भरण्यासाठी रोजीच्या शोधार्थ सैरावैरा मोकाट धावण्याखेरीज त्यांना काही पर्याय उरत नाही."

( २ ) "एका वेळी हाताच्या तळव्याएवढ्या असणाऱ्या सामाजिक-आर्थिक प्रश्नांनी आता सारे आकाश कोंदाटून टाकायला सुरुवात केली आहे. समाजधारणेच्या मुळावरच ते उठण्याचा धोका निर्माण झाला आहे. स्वातंत्र्योत्तर काळातील प्रारंभीच्या काही वर्षांत अंगिकारलेल्या धोरणांतून हे प्रश्न सुटण्यासारखे नाहीत हे तर झालेच; वाईट असे की, या धोरणांनी त्या प्रश्नांची उग्रता वाढण्यासच मदत होत असल्याचे दिसते. तंत्रविद्येच्या हस्तांतरातील अडचणी, द्विदल अर्थव्यवस्थेतील सधन व निर्धन यांच्यातील रुंदावत चाललेली दरी, कर्जाचा कंबरडे मोडून टाकणारा बोजा, आणि सर्वांहूनही जास्त म्हणजे, बेकारी, असे हे भवितव्य काळवंडून टाकणारे प्रश्न आहेत.

(३) "प्रशासन, शिक्षण, आरोग्य, सेवा यांसारख्या केवळ खर्च करावयाच्या बाबी आणि अर्थव्यवस्थेची पायाभरणी (इन्फ्रास्ट्रक्चर) यावरील खर्चांत खूप मोठी वाढ झाल्याने आर्थिक वाढ होत असल्याचा आभास निर्माण होतो हे उघडच

आहे. प्रत्यक्षात मात्र त्या देशाची वाटचाल दिवाळखोरीच्या दिशेने चाललेली असण्याची शक्यता असते.”

1) ... almost any progressive action may be cutting away an element of livelihood from the poorest. Peasant society keeps this poorest section in being by a hair's breadth; change will throw it onto the economy in search of wages unless the poor too can be brought in a single stride into a more productive system.

2) Major social and economic problems once no bigger than a man's hand are beginning to darken the sky, heavy with political threat. Not only are they problems to which these early policies have no answer : worse still, the policies appear to hasten their onset. They take shape as difficulties in the transfer of technology, as a widening gap between rich and poor in a dual economy; amounting burden of indebtedness; above all as unemployment,

3) It is obvious that very large increases in spending services (government, education, health, service) and in infrastructure can give the appearance of an economic growth though it may infact be heading the country rapidly towards bankruptcy.